रायगड जिल्हयातील घारापुरी येथील एलिफंटा बेटावर दिशादर्शक दिवे लावण्यासाठी टॉवर्स / पोल उभारण्याकरिता ०.००७५ हे. अवर्गीकृत वनजमिन वळती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एफएलडी-१३१४/प्र.क्र.१६१/फ-१०**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक: ०६/०६/२०१५

**वाचा-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१७/NC/II/I.D.१२३४२/(५३)/४९१/१४-१५, दिनांक २३/०६/२०१४

२) शासन निर्णय समक्रमांक, दिनांक ०२/०२/२०१५

३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१७/NC/II/I.D.१२३४२/(५३)/५३/१५-१६, दिनांक १३/०४/२०१५

**प्रस्तावना :-**

मुख्य व्यवस्थापक (वित्त), जवाहरलाल नेहरु पोर्ट ट्रस्ट, शेवा, ता.उरण, जि.रायगड यांनी रायगड जिल्हयातील घारापुरी येथील एलिफंटा बेटावर दिशादर्शक दिवे लावण्यासाठी टॉवर्स /पोल उभारण्याकरिता ०.००७५ हेक्टर अवर्गीकृत वनजमिन वळतीकरणाचा प्रस्ताव राज्याच्या वन विभागास सादर केला होता. त्यानुसार वरील अ.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये त्यास तत्वत: मंजुरी देण्यात आली आहे. त्यातील अटींची पूर्तता केल्यानंतर या प्रस्तावास अंतिम मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

भारत सरकारच्या आदेश क्रमांक- F.No. ११-९/९८/FC, दिनांक १३/०२/२०१४ अन्वये राज्यांना दिलेल्या अधिकारांचा वापर करून, महाराष्ट्र शासनाने, रायगड जिल्हयातील घारापुरी येथील एलिफंटा बेटावर दिशादर्शक दिवे लावण्यासाठी टॉवर्स / पोल उभारण्याकरिता वन(संवर्धन) अधिनियम, १९८० च्या कलम-२(ii) खाली ०.००७५ हेक्टर अवर्गीकृत वनजमिन वळतीकरण करण्याबाबत प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१७/NC/II/I.D.१२३४२/ ५३/४९१/१४-१५, दिनांक २३/०६/२०१४ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावास वरील अ.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये तत्त्वत: मंजुरी प्रदान केली होती.

प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वरील अ.क्र.३ येथील पत्रान्वये वरील तत्वत: मंजुरीच्या अटींचा अटीपूर्तता अहवाल शासनास सादर केला. सदर अटीपूर्तता अहवाल विचारात घेऊन तसेच वरील परिच्छेदात नमूद केलेल्या भारत सरकारच्या आदेशान्वये राज्यांना दिलेल्या अधिकारांचा वापर करुन, शासन याद्वारे, रायगड जिल्हयातील घारापुरी येथील एलिफंटा बेटावर दिशादर्शक दिवे लावण्यासाठी टॉवर्स / पोल उभारण्याकरिता वन(संवर्धन) अधिनियम, १९८० च्या कलम-२(ii) खाली ०.००७५ हेक्टर अवर्गीकृत वनजमिन वळतीकरण करण्याबाबत प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१७/NC/II/I.D.१२३४२/ ५३/४९१/१४-१५, दिनांक २३/०६/२०१४ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावास अंतिम मंजुरी देत आहे. वनजमिनीचा तपशील खालीलप्रमाणे-

| कामाचा प्रकार | गावाचे नांव | तालुका व जिल्हा | स.क्र./गट क्र. | वैधानिक दर्जा | क्षेत्र (हेक्टर) |
|---|---|---|---|---|---|
| दिशादर्शक दिवे २३b, २४b व २५b | घारापुरी | तालुका उरण, जिल्हा रायगड | ६७, ५९/a/b | अवर्गीकृत वन | ०.००७५ |

२. सदर मंजुरी खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) वनक्षेत्राचा वैधानिक दर्जा बदलणार नाही.

२) प्रकल्प प्रस्तावामध्ये ज्या कारणासाठी वनजमिन मागणी केलेली आहे त्या कारणाशिवाय इतर कारणासाठी वनजमिनीचा वापर करता येणार नाही.

३) केंद्र शासनाच्या नवीन मार्गदर्शक सूचनेनुसार प्रकल्प यंत्रणेस ०.००७५ हेक्टर वनजमिनीसाठी अनुज्ञेय नक्त वर्तमान मूल्याची रक्कम भरावी लागेल.

४) केंद्र शासनाच्या नवीन मार्गदर्शक सूचनेनुसार / सुधारित दरानुसार प्रकल्प यंत्रणेस नक्त वर्तमान मूल्याची रक्कम भरावी लागेल.

५) प्रकल्प यंत्रणा परिसरातील वनस्पती व प्राणिजात यांचे नुकसान करणार नाही. तसेच त्यांचे संवर्धन व संरक्षण करण्यासाठी आवश्यक त्या उपाययोजना प्रकल्प यंत्रणेस कराव्या लागतील.

६) वरील परिच्छेद-१ मध्ये नमुद केलेल्या केंद्र शासनाच्या सर्व पत्रातील अटी व शर्तींच्या अधीन राहून ही मान्यता प्रदान करण्यात आली आहे व त्या अटींचे पालन करणे प्रकल्प यंत्रणेवर बंधनकारक असेल.

७) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना योग्य वाटतील अशा इतर अटी.

८) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे हे प्रकल्प यंत्रणेने उपरोक्त अटींची पूर्तता केल्यानंतर प्रत्यक्षात वनजमिन वळतीकरणाची कार्यवाही करतील.

९) वर नमूद केलेल्या शासनाच्या तत्वत: मान्यता व अंतिम मान्यतेच्या पत्रातील विहित केलेल्या सर्व अटींचे प्रकल्प यंत्रणा अनुपालन करेल. प्रकल्प यंत्रणा सर्व अटींचे तंतोतंत अनुपालन करेल याची मुख्य अभियंता (प्रा), ठाणे हे खात्री करतील. मुख्य वनसंरक्षक (प्रा), ठाणे याबाबतचा अहवाल वेळोवेळी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना सादर करतील.

१०) वन (संवर्धन) अधिनियम, १९८० व त्याअंतर्गत केलेले नियम आणि मार्गदर्शक सूचना व या आदेशातील अटींपैकी कोणत्याही अटींचे अनुपालन न करणे हे वन (संवर्धन) अधिनियम, १९८० चा भंग ठरेल आणि त्याप्रमाणे याबाबत वैधानिक कारवाई करण्यात येईल. उपरोक्त अटींपैकी कोणत्याही अटींचे अनुपालन न केल्यास (non-compliance) संबंधित वन अधिकारी वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत दिनांक २५/१०/१९९२ रोजी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांतील कलम १.९ नुसार अहवाल राज्य शासनामार्फत अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, पश्चिम मध्य क्षेत्र, पर्यावरण व वन मंत्रालय, भारत सरकार, नागपूर यांना सादर करतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०६१६१२३८७८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: CN = TIWARI VIRENDRA RAMBAHAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST,CID - 917243
Date: 2015.06.06 16:15:46 +05'30'

**(वीरेन्द्र तिवारी)**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत,**

१. सचिव, पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
२. अपर प्रधान मुख्य मुख्य वनसंरक्षक, पश्चिम मध्य विभाग, पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. सचिव (वने) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर
६. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, सीबीडी, बेलापूर
७. मुख्य वनसंरक्षक (प्रा), ठाणे
८. जिल्हाधिकारी, रायगड
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड
१०.उपवनसंरक्षक, अलिबाग
११.मुख्य व्यवस्थापक (वित्त), जवाहरलाल नेहरु पोर्ट ट्रस्ट, शेवा, ता.उरण, जि.रायगड
१२.निवडनस्ती फ-१० कार्यासन

२. जिल्हाधिकारी, रायगड, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड व उपवनसंरक्षक, अलिबाग यांना निर्देशित करण्यात येते की, वरील आदेशाची प्रत स्थानिक संस्था, पंचायत, नगरपालिका, नगरपरिषद आणि संबंधित शासकीय कार्यालयांचे प्रमुख यांना पाठविण्यात यावी. तसेच त्यांनी वरील आदेश त्यांच्या कार्यालयातील सूचना फलकावर तसेच वरील कार्यालय प्रमुखांच्या सूचना फलकावर सर्वसामान्य जनतेच्या माहितीसाठी प्रदर्शिले जातील याची खात्री करावी.

३. मुख्य व्यवस्थापक (वित्त), जवाहरलाल नेहरु पोर्ट ट्रस्ट, शेवा, ता.उरण, जि.रायगड यांना निर्देशित करण्यात येते की, वन मंजुऱ्यांचे सर्व आदेश, सर्व्हे क्र., गट क्र. त्यांचे प्रत्येकाचे क्षेत्र आणि वैधानिक दर्जा इ. सह आणि महाराष्ट्र शासनाने मान्यतेच्या आदेशात घातलेल्या अटी व संरक्षित बाबी यांच्यासह एक स्थानिक भाषेतील व एक इंग्रजी भाषेतील प्रसिध्द अशा दोन दैनिक वृत्तपत्रात प्रसारित करावेत व त्याची प्रत मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे व उप वनसंरक्षक, अलिबाग यांना सादर करावी.

४. स्थानिक स्वराज्य संस्था, पंचायत, नगरपालिका, नगरपरिषद आणि संबंधित शासकीय कार्यालयांचे प्रमुख यांना निर्देशित करण्यात येते की, आदेशांची प्रत मिळाल्यापासून ३० दिवसापर्यंत सदर आदेश सूचना फलकावर प्रदर्शित करावे.

Diversion of 0.0075 ha unclassed forest land for construction of leading lights by erecting towers/poles on a foundation at Elephanta Island at Gharapuri in Raigad district.

**Government of Maharashtra**

**Revenue and Forest Department**

**Government Resolution No.: FLD-1314/CR-161/F-10**

Mantralaya, Mumbai 400032

Date: 06/06/2015

**Read –**

1) Principal Chief Conservator of Forests (HoFF), Maharashtra State, Nagpur's letter No. Desk -17/NC/II/I.D./12342/(53)/491/14-15, dated 23/06/2014
2) Government Resolution of even no. dated 02/02/2015
3) Principal Chief Conservator of Forests (HoFF), Maharashtra State, Nagpur's letter No. Desk -17/NC/II/I.D./12342/(53)/53/15-16, dated 13/04/2015

**Preamble-**

The Chief Manager (Finance), JNPT, Sheva, Tal. Uran, Dist Raigad has submitted a proposal for diversion of 0.0075 ha unclassed forest for construction of leading lights by erecting towers/poles on a foundation at Elephanta Island at Gharapuri in Raigad, to the State Forest Department. Government of Maharashtra vide its Government Resolution referred at Sr.No.2 above has granted in-principle approval to that proposal. After complying with the conditions laid down in the order of in-principle approval, it was under consideration of the Government to grant formal approval to the above diversion.

**Resolution-**

In exercise of powers delegated to the State Governments vide Government of India's order no. F.No. 11-9/98/FC, dated 13/02/2014, Government of Maharashtra has granted in-principle approval for diversion of 0.0075 ha. Unclassed Forest land for construction of leading lights by erecting towers/poles on a foundation at Elephanta Island at Gharapuri in Raigad, vide its Government Resolution referred at Sr.No.2 above to the proposal submitted by Principal Chief Conservator of Forests (HoFF), Maharashtra State, Nagpur vide his letter no.Desk -17/NC/II/I.D./12342/53/491/14-15, dated 23/06/2014.

Principal Chief Conservator of Forests (HoFF), Maharashtra State, Nagpur, vide his letter referred at Sr.No.3 submitted the compliance report of the conditions mentioned in in-principle approval order. After careful consideration of the compliance report and in exercise of powers delegated to the State Government's vide Government of India's orders mentioned

hereinabove, Government is pleased to grant formal approval to the diversion of 0.0075 ha. Unclassed Forest land under section 2 (ii) of the Forest (Conservation) Act, 1980, for construction of leading lights by erecting towers/poles on a foundation at Elephanta Island at Gharapuri in Raigad as per the proposal submitted by Principal Chief Conservator of Forests (HoFF), Maharashtra State, Nagpur's letter no. Desk -17/NC/II/I.D./12342/53/491/14-15, dated 23/06/2014. The details are as given below:-

| Item of work | Village | Taluka & Dist | Sur/Gut No. | Legal Status | Area in Ha. |
|---|---|---|---|---|---|
| Leading light 23b, 24b & 25b | Gharapuri | Tal-Uran, Dist. Raigad | 67, 59/a/b | Unclassed Forest | 0.0075 |

2. This sanction is issued subject to the following conditions-

1) The legal status of the land required will remain unchanged.
2) The forest land shall not be used for any purposes other than specified in the project.
3) The User Agency will defray the cost of Net Present Value of 0.0075 ha. of forest land as per latest guidelines of Government of India.
4) The User Agency will defray the additional/ revised cost of Net Present Value as per latest guidelines of Government of India.
5) The User Agency shall be responsible for any loss to the flora / fauna in the surroundings and therefore shall take all possible measures to conserve the same.
6) This sanction is granted subject to the compliance of the conditions mentioned in Government of India's letter's mentioned in Para-1 and conditions mentioned in the order of in-principle approval by the User Agency and it is mandatory for the User Agency to comply all these conditions.
7) Any other condition which Principal Chief Conservator of Forests (Head of Forest Force), Maharashtra State, Nagpur may impose.
8) The actual diversion of forest land shall be effected thereafter by the Chief Conservator of Forests (T), Thane after compliance of all the conditions by the User Agency.
9) The User Agency shall comply with all the conditions stipulated in the in-principle and formal approval letters of Government Resolutions of Government of Maharashtra. The Chief Conservator of Forests (Territorial), Thane shall ensure the strict compliance of the conditions by the User Agency. Chief Conservator of Forests (Territorial), Thane will furnish the report in this regard to Additional Principal Chief Conservator of Forests and Nodal Officer, Maharashtra State, Nagpur from time to time.
10) Non-compliance of any of the conditions mentioned in this order and Rules and Guidelines made / issued under Forest (Conservation) Act, 1980, shall amount to violation of Forest (Conservation) Act, 1980 and action would be taken accordingly. In case of non-compliance of any of the above conditions, the concerned Chief Conservator of Forests / Deputy Conservator of Forests shall report through the State Government to Additional Principal Chief Conservator of Forests, Government of India, Ministry of Environment, Forests & Climate Change, Nagpur as per procedure laid down in the clause 1.9 of guidelines on 25/10/1992 under the Forest (Conservation) Act, 1980.

This Government resolution of Maharashtra Government is available at the websitewww.maharashtra.gov.in. Reference no. for this is 201506061612387819. This order has been signed digitally.

By order and in the name of the Governor of Maharashtra.

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: CN = TIWARI VIRENDRA RAMBAHAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST,CID - 917243
Date: 2015.06.06 16:16:08 +05'30'

**(Virendra Tiwari)**

Chief Conservator of Forests (Mantralaya)

Copy forwarded to:

1. Secretary, Ministry of Environment, Forests and Climate Change, Government of India, New Delhi.
2. Additional Principal Chief Conservator of Forests, Regional office (WCZ), Ministry of Environment, Forests and Climate Change, Government of India, Nagpur
3. Principal Chief Conservator of Forests (Head of Forest Force), Maharashtra State, Nagpur
4. P. A. to Secretary (Forests), Revenue & Forest Department, Mantralaya, Mumbai
5. Additional Principal Chief Conservator of Forests & Nodal Officer, Maharashtra State, Nagpur
6. Commissioner, Konkan Region, CBD, Belapur.
7. Chief Conservator of Forests (T), Thane
8. Collector, Raigad.
9. Chief Executive Officer, Zilla Parishad, Raigad
10. Deputy Conservator of Forests, Alibag.
11. Chief Manager (Finance), JNPT, Sheva, Tal. Uran, Dist Raigad
12. Select File-F-10.

2. Collector, Raigad and CEO, ZP, Raigad and Deputy Conservator of Forests, Alibag are hereby directed to forward the copy of this order to concerned Heads of Local Bodies, Panchayats, Municipal Bodies in addition to the relevant offices of the Government and they shall also ensure the display of this order on their notice board as well as on the notice board of local self government bodies for the information of general public.

3. Chief Manager (Finance), JNPT, Sheva, Tal. Uran, Dist Raigad is hereby directed that they should publish the entire order of forest clearances granted in verbatim along with the details of Survey No., Gut No., area and legal status of each Survey, Gut No.etc. and along with the conditions and safe guards imposed by the Maharashtra Government while granting forest clearances in two widely circulated daily newspapers, one in vernacular language and other in English language and submit the copies of newspapers to Chief Conservator of Forests (Territorial), Thane & Deputy Conservator of Forests, Alibag.

4. Heads of Local Bodies, Panchayats and Municipal Bodies in addition to the relevant offices of the Government are hereby directed to display the same on their notice board for 30 days from the date of receipt for the information of general public.